**मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर यांच्या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दिनांक ०१.१०.२०१६ ते २८.०२.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. मुदतवाढ-२०१६/(५९४/२०१६)/मोप्र-(२)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :१०.११.२०१६

**पहावे:-** १. शासन निर्णय क्र. मुदतवाढ-२०१६/(१०/२०१६)/मोप्र-२ दि.०१.०३.२०१६.
२. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर यांचे पत्र क्र.३०६०/आस्था-८/मुदतवाढ/२०१६ दि.१२/०७/२०१६.
३. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/वित्तीय सुधारणा-१ दि.२१/९/२०१६

**शासन निर्णय:-**

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०३.२०१६ ते ३०.०९.२०१६ पर्यंत चालू ठेवण्यास मंजूरी देण्यांत आली होती. तसेच सर्व प्रशासकीय विभगांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापुर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना ३० सप्टेंबर २०१६ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले होते. तथापी सर्व प्रशासकीय विभागांची सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याबाबतची कार्यवाही अद्याप पूर्ण झालेली नाही. ही बाब विचारात घेऊन संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये २८/०२/२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहे.

आता संदर्भीय क्रमांक २ च्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार सोबतच्या **विवरणपत्र -अ॰** मध्ये दर्शविल्यानुसार उपरोक्त कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना दिनांक ०१.१०.२०१६ ते २८.०२.२०१७ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मंजुरी देण्यात येत आहे.

यावर होणारा खर्च मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च (८०), सर्वसाधारण, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका, (०४) योजनेतर-वेतनावरील खर्चासाठी भाग भांडवली अंशदान (०४)(०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०१ आय १७१) या लेखाशिर्षाखालील खर्ची टाकावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागवावा.

हे आदेश वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/वित्तिय सुधारणा-१, दिनांक २१.०९.२०१६ नुसार व आंतरवित्त सल्लागार व उप सचिव यांचे सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११७१६४१४१०४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang Tulshiram Kedare

Digitally signed by Pandurang Tulshiram Kedare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e594e26c6ca4bffd8b1d4e20a155e473c21b0dd40f25c25bd478079005896501, cn=Pandurang Tulshiram Kedare
Date: 2016.11.17 16:55:31 +05'30'

**( पां. तु. केदारे )**

सोबत:- विवरणपत्र -अ॰

शासनाचे अवर सचिव

**प्रत:- सहपत्रासह,**

१) वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई,

२) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर,

३) महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर,

४) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर,

५) मोप्र-(२) संग्रहार्थ.

## विवरणपत्र -अ॰

## शासन निर्णय क्र. मुदतवाढ-२०१६/(५९४/२०१६)/मोप्र-२, दि.१०.११.२०१६ चे सहपत्र
## नियत अस्थाई आस्थापनेवरील एकूण ३० पदे (१/१०/२०१६ ते २८/०२/२०१६)

| अ.क्र. | पदनाम | आकृतीबंधानुसार मंजूर पदे | मुदतवाढ द्यावयाची पदे |
|---|---|---|---|
| १ | मुख्य अभियंता | १ | १ |
| २ | सहायक मुख्य अभियंता (कार्यकारी अभियंता) | २ | २ |
| ३ | उप अभियंता | ३ | ३ |
| ४ | कनिष्ठ अभियंता | ३ | ३ |
| ५ | मुख्य आरेखक | १ | १ |
| ६ | विशेष अधिक्षक | १ | १ |
| ७ | अधिक्षक | १ | १ |
| ८ | मुख्य दप्तर कारकून | १ | १ |
| ९ | प्रथम लिपिक | १ | १ |
| १० | वरिष्ठ लिपिक | २ | २ |
| ११ | कनिष्ठ लिपिक | २ | २ |
| १२ | टंकलेखक | ३ | ३ |
| १३ | लघु लेखक(उच्च/निम्न श्रेणी) | १ | १ |
| १४ | दूरध्वनी चालक | १ | १ |
| १५ | वाहन चालक | १ | १ |
| १६ | दप्तरी | १ | १ |
| १७ | नाईक | १ | १ |
| १८ | शिपाई | ३ | ३ |
| १९ | चौकीदार | १ | १ |
| | **एकूण** | **३०** | **३०** |

**एकूण पदे ३०**